**शासनाच्या महासूत्रधारी कंपनीमार्फत केलेली भांडवली गुंतवणूक दर्शविण्यासाठी नविन लेखाशिर्षे उघडण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.लेखाशिर्ष-२०१९/प्र.क.५१/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक :- २४ जानेवारी, २०२०

**संदर्भ:**-१) शासन निर्णय क्र.ईएलए-१००३/प्र.क्र.८५८८/भाग-२/ऊर्जा-५, दि. २४ जानेवारी, २००५.
२) शासन निर्णय क्र. रिफॅार्म-१००५/प्र.क्र.९०६१/ऊर्जा-५, दि ७ जून, २००५
३) शासन निर्णय क्र.रिफॅार्म-२०१०/प्र.क्र.११७/ऊर्जा-३, दि. ३१मार्च,२०१६

**प्रस्तावना** :-

महाराष्ट्र राज्य विद्युत महासुत्रधारी कंपनी, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी व महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी या कंपन्या संदर्भिय शासन निर्णय क्र. १ अन्वये अस्तित्वात आलेल्या आहेत.

२. शासनामार्फत उपरोक्त नमुद महानिर्मिती, महावितरण व महापारेषण कंपन्यांना भागभांडवल वितरीत करण्यात येते. शासनामार्फत सदर कंपन्यांमध्ये केलेली भांडवली गुंतवणूक शासनाची प्रमुख गुंतवणूकदार कंपनी महासुत्रधारी कंपनीमार्फत केलेली गुंतवणूक म्हणून महालेखापाल कार्यालयाच्या वित्तीय लेख्यामध्ये दर्शविण्यासाठी खालीलप्रमाणे तीन नविन लेखाशिर्षे उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

पुर्वीच्या महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाचे विभाजन केल्यानंतर सन २००५ पासून महासूत्रधारी, महावितरण, महानिर्मिती व महापारेषण या कंपन्या अस्तित्वात आलेल्या आहेत. महावितरण, महानिर्मिती व महापारेषण या कंपन्यांना शासनाकडून भागभांडवल देण्यात येते व सदर भांडवली गुंतवणूक महालेखापाल कार्यालयाच्या वित्तीय लेख्यामध्ये शासनाची महासुत्रधारी कंपनीमार्फत केलेली भांडवली गुंतवणूक म्हणून दर्शविण्यासाठी खालीलप्रमाणे तीन नविन लेखाशिर्षे उघडण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष मराठीमध्ये | लेखाशिर्ष इंग्रजीमध्ये |
|---|---|---|
| १ | मागणी क्र.के-११<br>मुख्यलेखाशिर्ष-४८०१ वीज प्रकल्पावरील भांडवली खर्च<br>उपमुख्य लेखाशिर्ष-०२ औष्णिक वीज निर्मिती<br>गौणशिर्ष-१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका | Demand No. K-11<br>Major Head-4801 Capital Outlay on Power Projects<br>Sub Major Head-02 Thermal Power Generation<br>Minor Head-190 Investment in Public Sector and other Undertakings |

| | | |
|---|---|---|
| | गटशिर्ष-०० उपगट शिर्ष-(०८) महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनीमध्ये भांडवली गुंतवणूक (महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीस भागभांडवल) कार्यक्रम ४८०१४०८६ ५४ गुंतवणूका | Group Head- 00 Sub Group Head- (08) Capital Investment in Maharashtra State Electricity Board Holding Company Ltd. (Capital Investment Maharashtra State Power Generation Company Ltd.) Scheme 48014086 Object-54 Investment |
| २ | मागणी क्र.के-११ मुख्यलेखाशिर्ष-४८०१ वीज प्रकल्पावरील भांडवली खर्च उपमुख्य लेखाशिर्ष-०५ पारेषण व वितरण गौणशिर्ष-१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका गटशिर्ष-०१ उपगट शिर्ष-(०१) महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनीमध्ये भांडवली गुंतवणूक (महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीमध्ये भांडवली गुंतवणूक) कार्यक्रम ४८०१४०९५ ५४ गुंतवणूका | Demand No. K-11 Major Head-4801 Capital Outlay on Power Projects Sub Major Head- 05 Transmission and Distribution Minor Head-190 Investment in Public Sector and other Undertakings Group Head- 01 Sub Group Head- (01 ) Capital Investment in Maharashtra State Electricity Board Holding Company Ltd. (Capital Investment in Maharashtra State Electricity Distribution Co. Ltd.) Scheme 48014095 Object-54 Investment |
| ३ | मागणी क्र.के-११ मुख्यलेखाशिर्ष-४८०१ वीज प्रकल्पावरील भांडवली खर्च उपमुख्य लेखाशिर्ष-०५ पारेषण व वितरण गौणशिर्ष-१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका गटशिर्ष-०१ उपगट शिर्ष-(०२) महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनीमध्ये भांडवली गुंतवणूक (महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनीमध्ये भांडवली गुंतवणूक) कार्यक्रम ४८०१४१०१ ५४ गुंतवणूका | Demand No. K-11 Major Head-4801 Capital Outlay on Power Projects Sub Major Head-05 Transmission and Distribution Minor Head-190 Investment in Public Sector and other Undertakings Group Head- 01 Sub Group Head- (02) Capital Investment in Maharashtra State Electricity Board Holding Company Ltd. (Capital Investment in Maharashtra State Electricity Transmission Co. Ltd.) Scheme 48014101 Object-54 Investment |

३. सदर शासन निर्णय महालेखापाल कार्यालयाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ११३/२०१९-२०/७८९, दि. ११/११/२०१९ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ३१४/२०१९-अर्थ-१४, दि. ३०/१२/२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२००१२४१६०४४२९७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nanasaheb Rajaram Dhane

Digitally signed by Nanasaheb Rajaram Dhane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, serialNumber=6c39e2858150dbdfcfe6cd25ed08adf59f4d2fd8c1ede1730735f604904bf3bb, cn=Nanasaheb Rajaram Dhane
Date: 2020.01.24 15:46:08 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**

अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्यादित, हाँगकाँग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई.
२) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१
३) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१
४) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत महापारेषण कंपनी मर्यादित, प्रकाशगंगा, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१
५) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद / विधानसभा, विधान भवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
७) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
९) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१), चर्चगेट, मुंबई.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे, मुंबई.
११) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
१२) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१४ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६/ऋण व हमी सनियंत्रण कक्ष) मंत्रालय, मुंबई-३२
१३) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.